**पदवी / पदव्युत्तर शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांसाठी कृषि विभागांतर्गत विविध कार्यालयांमध्ये आंतरवासिता (Internship) उपक्रम राबविण्यास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः कृआंउ-२०२५/प्र.क्र.११३/१३-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०००३२,

दिनांक: २८ मे, २०२५

**संदर्भ :**

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एनईपी-२०२४/प्र.क्र. ११/विशि-३, दिनांक ०५ फेब्रुवारी, २०२४

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एनईपी-२०२३/प्र.क्र. १७६/विशि- ३, दिनांक २९ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना :**

कृषि क्षेत्रामध्ये वातावरण बदलासह बाजार व्यवस्थेमधील चढ-उतारांमुळे जोखीम निर्माण झाली असून त्याचा प्रतिकूल परिणाम शेती आणि शेतीवर मोठ्या संख्येने अवलंबून असलेल्या लोकसंख्येवर होत आहे. अशा जोखीमांना सामोरे जाण्यासाठी शेतकऱ्यांना सक्षम करणे गरजेचे आहे आणि त्यासाठी नवीन संशोधन शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविणे, उच्च तंत्रज्ञान सुविधा उपलब्ध करणे, शेतकऱ्यांना कृषि विषयक सल्ला-सेवा आणि अद्ययावत माहितीची तात्काळ सुलभ उपलब्धता होणे इ. बाबी अत्यावश्यक ठरत आहेत. शेतकऱ्यांच्या ह्या गरजा लक्षात घेऊन कृषि विभागामार्फत विविध कार्यक्रमांची आणि प्रकल्पांची आखणी तसेच अंमलबजावणी करण्यात येत आहे. अशा उपक्रमांची यशस्विता वाढविण्यासाठी अद्ययावत संशोधन आणि तंत्रज्ञान विकसनाची जोड या उपक्रमांना मिळणे गरजेचे आहे.

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० अन्वये शैक्षणिक अभ्यासक्रमामध्ये आंतरवासिता (Internship) उपक्रम हा महत्वाचा भाग असून सर्व विद्यापीठांमध्ये शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना आंतरवासिता लागू करण्यात आली आहे. त्यानुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाने संदर्भांकित शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांनी विभाग / क्षेत्रीय कार्यालये / योजना / प्रकल्पांतर्गत अकृषि विद्यापीठातील व त्यासंलाग्नित महाविद्यालये / उच्च शिक्षण संस्थामधील विद्यार्थ्यांना आंतरवासिता उपक्रम उपलब्ध करून देण्याबाबत मार्गदर्शक तत्वे विहित केली आहेत. त्यामुळे विविध विद्या शाखांमध्ये शिक्षण घेत असलेले युवक - युवती कृषि विभागाच्या विविध

उपक्रमांमध्ये सामील झाल्यास त्यांच्या अद्ययावत ज्ञानाचा कृषि विभागास व पर्यायाने शेतकऱ्यांना फायदा होईल. त्यायोगे सदर विद्यार्थ्यांना देखील कृषि क्षेत्राशी निगडीत प्रत्यक्ष अनुभव मिळेल, त्यांच्यामध्ये आंतर विद्याशाखीय दृष्टीकोन विकसित होण्यास मदत होईल आणि त्यांचे अनुभवविश्व वास्तववादी दृष्टीकोनासह समृद्ध होऊन त्यांच्या भावी व्यावसायिक कारकिर्दीसाठी ते उपयुक्त ठरेल.

उपरोक्त पार्श्वभूमीवर कृषि विभागांतर्गत ग्राम पातळीपासून राज्य स्तरापर्यंत विविध कार्यालयांमध्ये आंतरवासिता उपक्रम उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

१. कृषि विभागाच्या अधिपत्याखालील खालील नमूद विविध कार्यालयांमध्ये कृषि, अकृषि व खाजगी विद्यापीठातील व त्या संलग्नित महाविद्यालये / उच्च शिक्षण संस्थामधील विद्यार्थ्यांना आंतरवासिता उपक्रम उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे :

**अ. राज्य स्तर :**

i. कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
ii. कृषि आयुक्तालय, पुणे
iii. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
iv. मा बाळासाहेब ठाकरे .कृषि व्यवसाय आणि ग्रामीण परिवर्तन प्रकल्प (स्मार्ट), पुणे
v. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
vi. वसंतराव नाईक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
vii. महाराष्ट्र कृषि औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
viii. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे

**आ. विभाग स्तर :**

i. विभागीय कृषि सहसंचालक कार्यालय (ठाणे, पुणे, कोल्हापूर, नाशिक, छत्रपती संभाजीनगर, लातूर, अमरावती, नागपूर)
ii. प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (खोपोली, पुणे, कोल्हापूर, नाशिक, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नागपूर)
iii. डॉ. बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली जि. रत्नागिरी
iv. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहिल्यानगर
v. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
vi. डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला

**इ. जिल्हा स्तर :**

i. जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालय

ii. प्रकल्प संचालक आत्मा कार्यालय

iii. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद

iv. विविध प्रयोगशाळा (माती व पाणी परीक्षण, बियाणे, डीएनए फिंगर प्रिंटींग, खते व औषधे, कीडनाशके उर्वरित अंश तपासणी)

**ई. उप विभाग स्तर :**

i. उपविभागीय कृषि अधिकारी कार्यालय

ii. फळरोप वाटिका

**उ. तालुका स्तर :**

i. तालुका कृषि अधिकारी कार्यालय

**ऊ. ग्राम स्तर :**

i. कृषि सहाय्यक

२. सद्यस्थितीत, कृषि विद्यापीठाच्या विविध कृषि व संलग्न विद्याशाखांपैकी बहुतांश विद्याशाखांमध्ये शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना आंतरवासिता उपक्रम त्यांच्या पाठ्यक्रमाचा भाग नसला तरी सदर विद्यार्थ्यांची इच्छुकता असल्यास त्यांना देखील या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार कृषि विभागांतर्गत आंतरवासिता उपलब्ध करून द्यावी.

३. सदर आंतरवासिता उपक्रम पदवी तसेच पदव्युत्तर शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांसाठी लागू राहतील.

४. सदर आंतरवासिता उपक्रमाचा कालावधी किमान ४ आठवडयांपासून कमाल ६ महिन्यांपर्यंतचा असेल. त्याचप्रमाणे शक्य असल्यास विद्यापीठाच्या सत्रअभ्यासक्रमादरम्यान दररोज किमान दोन तास काम करुन (Part time) आंतरवासिता उपक्रम पूर्ण करण्याचा पर्याय विद्यार्थ्यांना उपलब्ध असेल.

५. आयुक्त (कृषि) यांनी कृषि विभागांतर्गत आंतरवासिता क्षेत्रे निश्चित करून कृषि विभागाच्या विविध कार्यालयांमध्ये विद्यार्थ्यांना आंतरवासिता उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने सविस्तर आराखडा तयार करावा व तो विभागाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावा. कृषि क्षेत्रामध्ये आंतरवासिता उपक्रमासाठी क्षेत्रांची यादी उदाहरणादाखल परिशिष्ठ ८ मध्ये देण्यात येत आहे

६. आंतरवासिता उपक्रमाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग स्तरावर उप सचिव (आस्थापना, मंत्रालय खुद्द) यांची समन्वयक म्हणून नियुक्ती करण्यात येत असून कृषि विभागाच्या सर्व

राज्य स्तरीय कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या कार्यालयातील कार्यरत अधिकाऱ्याकडे समन्वयक तथा मार्गदर्शक (Coordinator & Mentor) म्हणून जबाबदारी द्यावी.

७. विभाग, जिल्हा व उप विभाग स्तरीय आंतरवासिता उपक्रमासाठी संबधित कार्यालय प्रमुख मार्गदर्शक म्हणून काम पाहतील आणि तालुका व ग्राम स्तरीय आंतरवासिता उपक्रमासाठी तालुका कृषि अधिकारी मार्गदर्शक म्हणून काम पाहतील.

८. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विद्यार्थ्यांना आंतरवासितेची संधी उपलब्ध करून देण्यासाठी https://internship.aicte-india.org/ हे पोर्टल विकसित केले असून सदर पोर्टलवर कृषि विभागाच्या सर्व कार्यालय प्रमुखांनी नोंदणी करावी, सदर नोंदणी विहित कालावधीत होण्याच्या दृष्टीकोनातून आयुक्त (कृषि) यांनी क्षेत्रीय अधिकाऱ्यांचे प्रशिक्षण घ्यावे तसेच संनियंत्रण करावे.

९. कृषि विभागाच्या सर्व कार्यालयांनी आंतरवासिता उपक्रम राबविण्यासाठी अपेक्षित विद्यार्थी संख्या आणि आवश्यक पात्रता निकष शैक्षणिक वर्षाच्या सुरुवातीस विभागाच्या वेबसाईटवर व AICTE च्या पोर्टलवर जाहीर करावेत.

१०. विद्यार्थ्यांकडून AICTE पोर्टलवर आंतरवासिता उपक्रमासाठी अर्ज करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अर्जांना मान्यतेचे अधिकार कृषि विभागातील विविध स्तरावरील कार्यालय प्रमुखांना राहतील आणि तालुका व ग्राम स्तरावरील अर्जांसाठी मान्यतेचे अधिकार तालुका कृषि अधिकाऱ्यांना देण्यात येत आहेत.

११. **ग्राम स्तरावरील आंतरवासिता**

शेतकऱ्यांनी नवनवीन तंत्रज्ञान आत्मसात करावे आणि त्यांच्या ज्ञानामध्ये व कौशल्यामध्ये वाढ करण्याच्या उद्देशाने ग्राम स्तरावर कृषि सहाय्यकांकडून विस्तार कार्य करण्यात येते आणि सदर कार्यवाही वर्षभर पिकांच्या हंगामानुसार आणि पीक पद्धतीनुसार अव्याहतपणे सुरु असते. शेतकऱ्यांच्या विविध गरजा लक्षात घेऊन विस्तार कार्यामध्ये खरीप आणि रब्बी हंगामाच्या तयारीसाठी विशेष प्रयत्न करण्याची गरज असते. त्यासाठी शेतकऱ्यांशी आणि शेतकरी गटांशी मोठ्या प्रमाणात व्यक्तीशः, गट स्वरुपात आणि दूरस्थ माध्यमाने संपर्क करावा लागतो. हे लक्षात घेऊन महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचाही सदर विस्तार कार्यात सहभाग झाल्यास त्याचा फायदा शेतकऱ्यांना, विभागाला आणि खुद्द विद्यार्थ्यांनाही होणार आहे; म्हणून ग्राम स्तरावर कृषि सहाय्यकांच्या समवेत आंतरवासिता उपक्रमदेखील समाविष्ट करण्यात येत आहे. यामुळे महाविद्यालयामध्ये शिक्षण घेत असलेल्या स्थानिक विद्यार्थ्यांना त्यांच्याच परिसरातील गावांमध्ये कृषि विषयक नवीन ज्ञान आणि कौशल्ये प्राप्त करण्याचा आणि प्रत्यक्ष कामाचा अनुभव घेण्याच्या संधी निर्माण होतील.

**१२. आंतरवासिता कालावधीत आंतरवासित विद्यार्थ्यांनी अनुपालन करावयाचे वर्तणुक नियमः-**

i. सर्वसाधारणपणे विभागाच्या कर्मचाऱ्यांना लागू असलेले नियमांचे पालन आंतरवासित विद्यार्थ्यांकडून केले जाईल.

ii. आंतरवासित विद्यार्थी विभागाच्या गोपनीयतेचे पालन करेल आणि विभाग, त्याचे कार्य आणि धोरणांशी संबंधित गोपनीय माहिती कोणत्याही व्यक्ती किंवा संस्थेला उघड करणार नाही.

iii. आंतरवासित विद्यार्थी कोणत्याही बौद्धिक संपत्तीच्या अधिकाराचा दावा करणार नाही, विभागामध्ये केलेल्या कामावर आणि विभागाच्या बौद्धिक मालमत्तेची गोपनीयता काटेकोरपणे राखील. त्याचे उल्लंघन झाल्यास आंतरवासित विद्यार्थी व तो ज्या उच्च शिक्षण संस्थेशी संबंधित आहे ती संस्था कारवाईसाठी पात्र राहील.

iv. प्रकल्प कार्याच्या फलनिष्पत्तीवर विद्यार्थी आणि संबंधित उच्च शिक्षण संस्था यांचा कोणताही दावा असणार नाही, पेटंट, डिझाईन्स, सॉफ्टवेअर कॉपीराइट (स्रोत कोड) आणि प्रकाशनामध्ये, प्रकल्पाच्या कामादरम्यान निर्माण होणारे सर्व बौद्धिक संपदा अधिकार कृषि विभागाकडे राहतील.

v. आंतरवासित विद्यार्थी विभागाच्या पूर्व परवानगीने, त्यांचे कार्य शैक्षणिक संस्थांसमोर आणि सेमिनार/परिषदांमध्ये सादर करू शकतील. तथापि, या प्रयोजनाकरीता विभागासाठी गोपनीय असलेली माहिती कोणत्याही परिस्थितीत उघड करता येणार नाही.

vi. आंतरवासित विद्यार्थीद्वारे लिहिलेले किंवा प्रकाशित केलेले कोणतेही कागदपत्रे आणि दस्तऐवजांमध्ये अशी चेतावणी असली पाहिजे की दृश्ये/दस्तऐवज ही आंतरवासित विद्यार्थ्याची वैयक्तिक मते आहेत.

vii. सर्वसाधारणपणे आंतरवासित विद्यार्थी त्रयस्थ पक्षांद्वारे विभागाशी संवाद साधू शकणार नाही किंवा त्याचे प्रतिनिधित्व करू शकणार नाही. तथापि, आंतरवासित विद्यार्थी त्यांच्या भूमिका आणि जबाबदाऱ्यांच्या स्वरूपावर अवलंबून विभागाच्या वतीने त्रयस्थ पक्षांशी संवाद साधू शकतील.

viii. कोणताही आंतरवासित विद्यार्थी प्रसार माध्यमांशी (प्रिंट आणि इलेक्ट्रॉनिक) विभागाच्या वतीने संवाद साधणार नाही.

ix. असमाधानकारक कामगिरी निदर्शनास आल्यास, संबंधित सक्षम प्राधिकारी आंतरवासिता मुदत पूर्ण होण्यापूर्वी आंतरवासित विद्यार्थ्यांकडून प्रकल्पाचे काम काढून घेऊ शकेल.

x. काही अपरिहार्य कारणामुळे उक्त कालावधी दरम्यान आंतरवासिता उपक्रम पूर्ण करणे शक्य न झाल्यास संबंधीत प्रशिक्षणार्थीने संबंधित कार्यालय प्रमुख यांना लेखी पूर्वसूचना देणे आवश्यक राहील.

**१३. आंतरवासिता उपक्रमाच्या अटी व शर्तीः-**

i. आंतरवासिता कालावधीत विद्यार्थ्यांना कोणत्याही प्रकारचे विद्यावेतन (stipend) अथवा अन्य आर्थिक लाभ अनुज्ञेय असणार नाही.

ii. आंतरवासिता कालावधीत गैरशिस्तीच्या कारणामुळे एखाद्या विद्यार्थ्यांचा आंतरवासिता उपक्रम रहीत/समाप्त करण्याचा अधिकार सबंधित कार्यालय प्रमुखांना राहील.

iii. आंतरवासिता उपक्रमाच्या नियमांत बदल करण्याचा अधिकार आयुक्त (कृषि) यांच्या संमतीने कार्यालय प्रमुखांना असेल,

iv. आंतरवासित विद्यार्थ्याला शासकीय कामाच्या संबंधित कोणत्याही त्रयस्थ व्यक्तीसोबत किंवा पक्षकारासोबत कोणताही करार/व्यवहार करता येणार नाही.

v. संबंधित कार्यालयातील समन्वयक तथा मार्गदर्शक हे आंतरवासिता उपक्रमाचा वार्षिक अहवाल पर्यवेक्षीय कार्यालयास सादर करतील

vi. आयुक्त (कृषि) तसेच अन्य राज्य स्तरीय कार्यालयांचे प्रमुख आंतरवासिता उपक्रमाचा वार्षिक अहवाल कृषि विभाग, मंत्रालय येथे पाठवतील.

vii. केंद्र शासनाच्या AICTE पोर्टल https://internship.aicte-india.org/ वरील नोंदणीच्या अनुषंगाने कृषि विभागाअतंर्गत आंतरवासिता पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांचा डेटाबेस (database), त्यांनी तयार केलेले अहवाल इत्यादी माहिती उपलब्ध होण्यासाठी AICTE पोर्टल सोबत जोडणी करण्यात येईल.

viii. आंतरवासिता उपक्रमामध्ये सुलभता व समानता असावी यासाठी कार्यपद्धतीच्या अनुषंगाने आवश्यक परिशिष्टे क्र. १ ते ७ सोबत जोडली असून त्याची तंतोतंत अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२८१९०९५१८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b

Digitally signed by 51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b
DN: cn=51b59e81-8ea7-4da3-9ce0-f3fd7635c54b
Date: 2025.05.28 19:22:44 +05'30'

**(विकासचंद्र रस्तोगी)**

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती :**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री, कृषि यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, फलोत्पादन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
१०. प्रकल्प संचालक, बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय आणि ग्रामीण परिवर्तन प्रकल्प (स्मार्ट), पुणे
११. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
१४. संचालक, वसंतराव नाईक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
१५. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१६. कुलसचिव, बाळासाहेब सावंत कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली जि. रत्नागिरी
१७. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहिल्यानगर
१८. कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
१९. कुलसचिव, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
२०.सर्व सह/उप सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.सर्व अधीक्षक कृषि अधिकारी
२२. सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
२३. प्राचार्य, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था
२४. निवड नस्ती, १३-अे

## Appendix 1-Offer Letter

With reference to your application and the later interview you have had with us, we are pleased to confirm your appointment as Intern in Department of Agriculture, Government of Maharashtra subject to the following terms and conditions.

1. The Intern shall follow the confidentiality protocol of the Department and shall not reveal to any person or organization confidential information relating to the Department, its work, and policies
2. The Intern shall not claim any intellectual property rights, of work done at the Department and must strictly keep the confidentiality of Department's intellectual property. Any violation/infringement will be viewed adversely against the intern as well as the institution to which he/she belongs and may invite right action.
3. The students and the college/university/educational Institute concerned shall have no claim whatsoever regarding the results of the project work. The department keeps all intellectual property rights in patents, designs, software copyright (source code) and publications, if any, that may be generated during project work.
4. Interns may, with the prior permission of the Department, present their work to academic bodies and at seminars/conferences. However, for this purpose information that is confidential to the department cannot be revealed under any circumstances.
5. Any papers and documents written and/or published by the Intern should carry the warning that the views are the personal views of the intern and do not stand for or reflect the views of the Department
6. The Interns will follow the advice given to them by the Department about representation to the third parties.
7. In general, an Intern may not interact with or represent the Department vis-à-vis third parties. However, Interns may specifically interact with third parties on behalf of the Department depending on the nature of their roles and responsibilities.
8. No Intern shall interact with or represent the Department to the media (print and electronic).
9. Interns shall adhere to workplace norms and abide by ethical standards followed by the Department
10. In case of unsatisfactory performance, the concerned intern may be told by the Department to drop the project work before the completion of the term of internship.
11. The internship shall be ended forthwith at any stage if the intern is found to be ineligible and/ or the information supplied is found to be incorrect or on grounds of misconduct.

I have read the terms of conditions and agree to abide by it. I hereby accept the offer of internship

Date:
Place:
Signature:

**Appendix 2-Self-Undertaking**

Student of........College, hereby undertakes as follows:

1. Confidentiality: I acknowledge that during my internship at the Water Resources Department, I may gain access to confidential information, Government internal procedure, etc. I undertake to maintain the highest level of confidentiality during and after my internship I understand that discussing or disclosing any confidential information to external parties is strictly prohibited.

2. No Claim on Research Work: I acknowledge that any research work, documents, reports, or intellectual property I create or develop during my internship will remain the exclusive property of the Water Resources Department. I understand and agree that I have no claim, ownership, or right to any such work produced during my internship.

3. Non-Disclosure of Information. I undertake not to disclose, share, or use, sharing, or using any information acquired during my internship for personal gain or the benefit of any other Individual, organization, or entity. I understand that this non-disclosure obligation extends beyond the termination of my internship with the Water Resources Department

4. Return of Materials: Upon the completion or termination of my internship, I will promptly return all materials, documents, or property belonging to the Water Resources Department, including any copies or reproductions made during the internship.

5. Compliance with Policies: I undertake that I will comply with all policies, rules, and regulations of Government of Maharashtra during my internship. I understand that failure to adhere to these policies may result in the termination of my internship.

6. I, acknowledge the 'Certificate of Internship will be awarded to me after successful completion of the internship.

By signing this undertaking, I affirm that I have read, understood, and agree to abide by the terms and conditions specified herein above.

Date:
Intern's Signature:
Place:
Name:

## Appendix 3-Certificate of Internship

This is to certify that <Mr/Ms> a student/graduate> of <University/ Institution has successfully completed his/her Internship with the Water Resources Department, Government of Maharashtra from to

During the period of internship, he/she was working with the <project name/ institution name and was diligently involved in the tasks and projects assigned. He/she proved commendable commitment, dedication, and initiative-taking attitude.

This certificate is awarded in recognition of his/her hard work, valuable contributions, and eagerness to learn which significantly enriched the organisation. We extend our best wishes in all his/her future endeavors.

Date:

Place:

Name and Signature of Authorized Signatory

## Appendix 4-Orientation Structure

1. Department Background
2. History
3. Vision, Mission, and Values
4. Department Structure
5. Major Projects/ Programmes
6. Department Culture
7. Office Timings and Attendance
8. Dress Code
9. Holidays
10. Lunch and other breaks
11. Leave policy
12. Confidentiality policy
13. Policies on sexual harassment and call and email etiquette
14. Code of conduct-expected behaviour from interns
15. Aid provided by the department during internship
16. Internship Structure
17. Expectations from Interns
18. Important Dates and Events
19. Guidelines for interacting with mentors/supervisors and other officials.
20. Accessibility to department resources

## Appendix 5-Task Assignment

- Mentor Details
- Mentor Name
- Designation
- Email ID
- Phone No.
- Internship Details
- Start Date
- End Date
- Duration
- Location
- Name of Allotted Interns
- Project/Institution (assigned to Intern 1)
- Project/Institution (assigned to Intern 2)
- Tasks (assigned to intern 1)
- Task
- Details
- Task one
- Task two
- Task three
- Tasks (assigned to intern 2)
- Task, Details

Date:
Mentor Signature:
Mentor Name:

**Appendix 6**

Internship Work Plan

1. Intern Details
2. Intern Name
3. Office/Division
4. Course
5. Year
6. Email ID
7. Internship Details
8. Start Date
9. End Date
10. Duration
11. Location

Name of Mentor/ Supervisor
Suggested Work Plan

- Task
- Detailed Sub-taks
- Due Date
- Mentor/ Supervise Review
- Task
- Task
- Task

Updated Work Plan

- Tasks
- Detailed Sub-tasks
- Due Date
- Completed (Yes/No)
- Intern Remarks
- Mentor/Remark

Supervisor

- Task one
- Task two
- Task three

Date:

Intern Signature:
Intern Name:

Mentor Signature:
Mentor Name:

## Appendix 7-Evaluation of Internship Programme

- Outcomes of Internship
- Details
- Did the internship achieve expected goals?
- Percentage of completed task with respect to uncompleted task.
- Reasons behind completion and not-completion of task such as lack of required skill sets in interns, lack of clarity, limited time, lack of resources provided etc.
- Application Rate
- No. of applications received
- Retention Rate
- No. of interns who completed internship/Application Rate
- Cost per Hire
- Total Cost for hiring one intern

# Appendix 8 Compendium of Internships in Agriculture

## Agriculture Department

### I. Sub Departments

1. Agriculture Department
2. Animal Husbandry & Dairying
3. Maharashtra State Agricultural and Marketing Board
4. Maharashtra Agriculture Industries Development Corporation
5. Maharashtra State Seed Corporation
6. Agriculture Technology Management Agency
7. Horticulture
8. Distribution
9. Statistics & Economics
10. Administration

### II. Key Projects/Schemes/Programmes/Policies (currently ongoing)

1. Project on Climate Resilient Agriculture (POCRA)- Nanaji Deshmukh Krishi Sanjeevani Project
2. Krishi YouTube
3. Hon. Balasaheb Thackeray Agribusiness and Rural Transformation (SMART) Project
4. PM Kisan Mandhan Yojana
5. PM Kisan Samman Nidhi Yojana
6. Participatory Guarantee System of India (PGS) India
7. Balasaheb Thackeray Agribusiness and Rural Transformation (SMART) Project
8. National Co-operative Development Corporation Assisted Projects
9. National Livestock Mission
10. National Project for Cattle & Buffalo Breeding
11. Project Consultancy Division
12. Terminal Market
13. Market Network (MARKET)
14. Irradiation of Onion
15. Pre-Cooling and Cold Storage
16. Manufacturing of Fertilizers & Pesticide Formation: Krushi Udyog
17. Food Processing: NOGA
18. Direct Benefit Transfer Scheme
19. Village Seed Production Program
20. National Food Security Mission
21. Quality Assurance Policy
22. Mahabeej Research Notified Products
23. Tissue Culture Laboratories
24. Mahabeej Nurseries
25. Electronic Data Processing (Data Cell)

## III. Scope of Work for Interns

- Data Collection and Assessment
- Assist in data collection and analysis for climate impact studies on agriculture.
- Support data collection and analysis on livestock health, productivity, and management practices.
- Collect and analyse data on beneficiary transactions and scheme effectiveness.
- Conduct field visits and inspections to ensure compliance with quality standards.
- Conduct data collection and analysis on food security indicators and outcomes.
- Document the outcomes and impact of various mission activities.
- Conduct field trials and data collection for new seed varieties.
- Assist in analysing research data and preparing reports on seed performance.

➢ **Agricultural Research and Development**

- Support the implementation and monitoring of climate-resilient agricultural practices.
- Document best practices and success stories from pilot projects and conduct research on innovative agribusiness models and rural transformation initiatives.
- Assist in the development and dissemination of training materials for farmers.
- Evaluate the impact of SMART Project initiatives on rural communities and agribusinesses.
- Assist in developing training modules and materials for livestock farmers.
- Support the dissemination of research findings to farmers and stakeholders.

➢ **Community and Stakeholder Engagement**

- Assist in user training sessions for farmers and market participants on schemes and programmes.
- Assist in developing training materials and digital resources for seed producers.
- Support the development of training materials for facility management and operations.

➢ **Digital Agriculture and Communication**

- Assist in content creation, including video production and editing, for the Krishi YouTube channel.
- Develop educational materials and scripts for agricultural extension videos.
- Monitor and analyse viewer engagement and feedback to improve content quality.
- Assist in developing digital platforms and tools for market information dissemination.

➢ **Project Management and Documentation**

- Support the management and analysis of agricultural data from various projects.
- Develop and maintain databases for tracking project progress and outcomes.
- Assist in generating reports and visualizations to support decision-making.
- Monitor and analyse market trends and data to support strategic planning.
- Support the digital documentation and tracking of seed production activities.
- Analyse data on seed production and quality to identify areas for improvement.

- **Policy Support and Implementation**
  - Assist in the outreach and enrolment process for the PM Kisan Mandhan Yojana.
  - Support the documentation and verification of beneficiary details.
  - Conduct analysis of scheme impact and prepare policy briefs.
  - Assist in the implementation and monitoring of Direct Benefit Transfer schemes.
  - Support the development of reports and presentations for policymakers.
  - Assist in developing and implementing quality assurance protocols for agricultural products.
  - Document findings and suggest improvements to quality assurance processes.
  - Support the implementation and monitoring of activities under the National Food Security Mission.
  - Assist in preparing reports and policy recommendations based on mission findings.
- **Agribusiness and Market Development**
  - Assist in assessing the infrastructure and operational needs of pre-cooling and cold storage facilities, analyse data on storage efficiency and impact on product quality and marketability.
  - Conduct research on best practices for terminal market operations and management.
  - Assist in the development and implementation of market infrastructure projects.
  - Monitor market performance and provide recommendations for improvement.
  - Support the assessment and improvement of animal feed manufacturing processes.
  - Assist in developing quality control protocols and training materials for manufacturers.
  - Conduct data analysis on feed quality and its impact on livestock health and productivity.
  - Assist in evaluating the efficiency and effectiveness of food processing units.
  - Support the development of training programs for food processing entrepreneurs.
  - Document and analyse data on food processing outcomes and market trends.
- **Gender & Agriculture Development**
  - Assist in researching gender roles in agriculture and identifying areas for improvement.
  - Help develop programs aimed at empowering women farmers and promoting gender equality.
  - Support outreach efforts to raise awareness about the importance of women's participation in agriculture.
- **Psychology and Farmer Support**
  - Assist in understanding the psychological needs of farmers and the impact of agricultural challenges on mental health.
  - Help develop support programs and resources aimed at improving farmer well-being.

- Support surveys and research to gather insights on farmer attitudes and behaviours.

## IV. Desirable Qualifications

Relevant degree in Agriculture, Environmental Science, Statistics (Excel, R, Python, Stata), Data Science, Agribusiness, Rural Development, Social Sciences, Communication, Digital Media, Information Technology, Business Administration, Public Policy, Economics, Agricultural Economics, Food Technology, Gender Studies, Psychology, Sociology.

-------------